कोव्हीड-१९ विषाणुचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी करावयाच्या विविध उपाययोजनांसाठी विभागीय आयुक्तांना निधी वितरित करण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन

**महसुल व वन विभाग**

**शासन निर्णय, क्रमांक: सीएलएस-२०२०/प्र.क्र.१२३/म-३**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : २४ जुलै, २०२०

संदर्भ : १) केंद्र शासन,गृह मंत्रालय,यांचे पत्र क्र. ३३-४/२०२०-NDM-I, दिनांक १४ मार्च, २०२०

२) केंद्र शासन,गृह मंत्रालय,यांचे पत्र क्र. ३३-४/२०२०-NDM-I, दिनांक २८ मार्च, २०२०

३) शासन निर्णय, समक्रमांक, दि. १६.३.२०२० , दि. २८.३.२०२०, दि. ०३.४.२०२०, दि. २१.४.२०२०, दि. २९.५.२०२० व दिनांक २५.६.२०२०

४) सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे पत्र क्र. कोरोना-२०२०/प्र.क्र.१७३/आरोग्य-५, दि. १.७.२०२०

५) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. ससंता/कावि-३/१२६/२०२०, दि.३०.६.२०२०

६) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र. उपआ/नैआ/पुनर्व/कली/कावि २४७ / २०२०, दि. २५.६.२०२०

७) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र. मशा/नैआ/कात-६/ठाणे/कोव्हीड-१९/अनु /२०२०,दि. ८.७.२०२०

८) विभागीय आयुक्त,कोकण यांचे पत्र क्र. मशा/नैआ/कार्या-६/कोकण/को-१९/निधी/ २०२०, दि. १४.७.२०२०

९) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र. मशा/नैआ/कात-६/कोव्हीड-डॉ/ता.नि. व्यवस्था/२०२०, दि. ८.७.२०२०

१०) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्र.२०२०/मशाका/नैआ/कावि, दि.१०.७.२०२०

**प्रस्तावना:**

राज्यामध्ये कोव्हीड-१९ विषाणुचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी करावयाच्या विविध उपाययोजना करण्यासाठी राज्य कार्यकारी समितीची दिनांक १६ मार्च, २०२० रोजी मुख्यसचिव यांच्या अध्यक्षतेखाली बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत राज्य कार्यकारी समितीने घेतलेल्या निर्णयानुसार कोव्हीड-१९ विषाणुच्या प्रादुर्भावामुळे पसरणारी रोगराई नियंत्रित करण्यासाठी विलगीकरण कक्ष स्थापन करणे,त्यासाठी तात्पुरती निवासी व्यवस्था करणे, अन्न, कपडे, वैद्यकीय देखभाल इत्यादी तसेच अतिरिक्त चाचणी प्रयोगशाळा स्थापन करण्याचा खर्च, अग्निशमन, पोलीस,स्थानिक स्वराज्य संस्था व आरोग्य सेवेतील कर्मचाऱ्यांच्या वैयक्तिक संरक्षणासाठी प्रतिरोधक साधनांचा खर्च व व्हेंटीलेटर,हवा शुध्दीकरण यंत्र, थर्मल स्कॅनर्स व इतर साधनांचा खर्च भागविण्यासाठी सर्व जिल्हयांना राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून संदर्भाधीन क्रमांक ३ येथील विविध शासन निर्णयान्वये जिल्हयांना एकूण रू ३३९.५६ कोटी इतका निधी अद्याप पर्यंत वितरित करण्यात आला आहे. याच प्रयोजनासाठी सार्वजनिक आरोग्य विभागाने संदर्भाधीन क्रमांक ४ व विभागीय आयुक्तांनी संदर्भाधीन क्रमांक ५ ते १० येथील पत्रान्वये अतिरिक्त निधी वितरित

करण्याची विनंती शासनास केली आहे. त्यानुसार राज्य कार्यकारी समितीने दिनांक १५.७.२०२० रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:

राज्यामध्ये कोव्हीड-१९ विषाणुचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी करावयाच्या विविध उपाययोजना करण्यासाठी सार्वजनिक आरोग्य विभागाने संदर्भाधीन क्रमांक ४ व विभागीय आयुक्तांनी संदर्भाधीन क्रमांक ५ ते १० येथील पत्रान्वये अतिरिक्त निधीची केलेल्या मागणीवर राज्य कार्यकारी समितीच्या दिनांक १५ जुलै, २०२० रोजी मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत चर्चा होवून राज्य कार्यकारी समितीने घेतलेल्या निर्णयानुसार कोव्हीड-१९ विषाणुचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी व कोव्हीड रूग्णांवर उपचार करण्यासाठी विविध उपाय योजना करण्यासाठी खाली नमूद केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी परिच्छेद क्रमांक २ मध्ये दर्शविल्याप्रमाणे राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून एकूण रूपये ९५,५७,००,०००/- (रूपये पंच्याण्णव कोटी सत्त्यावन्न लाख फक्त ) इतका निधी सार्वजनिक आरोग्य विभाग व विभागीय आयुक्त पुणे/कोकण/औरंगाबाद/अमरावती यांना वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

अ) बाधित झालेल्या व्यक्तींसाठी विलगीकरण कक्ष (घरातील विलगीकरण वगळून) स्थापन करणे, त्यासाठी तात्पुरती निवासी व्यवस्था करणे, अन्न, कपडे, वैद्यकीय देखभाल, नमुने गोळा करण्यावरील खर्च, तपासणी/छाननी व contact tracing साठी सहाय्य इत्यादी किंवा cluster containment संदर्भातील कार्यवाहीसाठी खर्च

ब) शासनाच्या अतिरिक्त चाचणी प्रयोगशाळा स्थापन करण्याचा खर्च व उपभोग्य वस्तू (Consumables), अग्निशमन, पोलीस,स्थानिक स्वराज्य संस्था व आरोग्य सेवेतील कर्मचाऱ्यांच्या वैयक्तिक संरक्षणासाठी प्रतिरोधक साधनांचा खर्च व व्हेंटीलेटर, हवा शुध्दीकरण यंत्र, थर्मल स्कॅनर्स व इतर साधनांचा खर्च .

क) लॉकडाऊन उपाययोजनामुळे राज्यात अडकलेले, मदत छावण्या व इतर ठिकाणी आश्रय घेतलेले स्थलातंरित कामगारांसह बेघर व्यक्ती यांना अन्न,वस्त्र,निवारा व वैद्यकीय देखभाल पुरविण्यासाठी होणारा खर्च

२. राज्य कार्यकारी समितीने घेतलेल्या निर्णयानुसार खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे वरील बाबींवरील खर्च भागविण्यासाठी विभागीय आयुक्तांना **रूपये ९५,५७,००,०००/- (रूपये पंच्याण्णव कोटी सत्त्यावन्न लाख फक्त )** इतका निधी उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | विभागीय आयुक्त | जिल्हा | मंजूर केलेला निधी ( रू लाखात ) |
|---|---|---|---|
| १. | **विभागीय आयुक्त, कोकण** | ठाणे | रू. ४०००.०० |
| | | मुंबई शहर | रू. १६२८.०० |
| | **एकूण कोकण विभाग** | | **रू ५६२८.००** |
| २. | **विभागीय आयुक्त, औरंगाबाद** | औरंगाबाद | रू. ८००.०० |
| | | जालना | रू. ७५.०० |
| | | परभणी | रू. ७५.०० |
| | | हिंगोली | रू. ५०.०० |
| | | नांदेड | रू. ७५.०० |
| | | बीड | रू. ५०.०० |
| | | लातूर | रू.१००.०० |
| | | उस्मानाबाद | रू.२५.०० |
| | **एकूण औरंगाबाद विभाग** | | **रू.१२५०.००** |

| | | | |
|---|---|---|---|
| ३. | विभागीय आयुक्त, अमरावती | अकोला | रू.१००.०० |
| | | यवतमाळ | रू. २२५.०० |
| | | बुलढाणा | रू. ५०.०० |
| | एकूण अमरावती विभाग | | रू ३७५.०० |
| ४. | विभागीय आयुक्त,पुणे | पुणे ग्रामीण | रू १०००.०० |
| | | सातारा | रू. २००.०० |
| | | सांगली | रू.२००.०० |
| | | सोलापूर | रू.३००.०० |
| | | कोल्हापूर | रू १००.०० |
| | एकूण पुणे विभाग | | रू. १८००.०० |
| ५. | सार्वजनिक आरोग्य विभाग | | रू. ५०४.०० |
| एकूण अ.क्र. १ ते ५ | | | रू. ९५५७.०० |

उपरोक्त प्रमाणे मंजूर निधी बीम्स प्रणालीवर सार्वजनिक आरोग्य विभाग व विभागीय आयुक्तांना कार्यासन म-११ यांनी वितरित करावा.

३. वरील निधी खर्च करताना राज्य शासनाच्या इतर विभागाच्या योजनांमधून त्याच बाबींवर खर्चाची व्दिरूक्ती होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी तसेच आरोग्य विभागाने घ्यावी. उपरोक्त परिच्छेद १(अ) मधील वैद्यकीय देखभालीवर होणारा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियानामधून देखील करण्यात यावा.

४. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन क्रमांक ३ येथील विविध शासन निर्णयातील सुचनांचे पालन करण्यात यावे. तसेच ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा. यामधील निधी आस्थापना विषयक बाबींवर, मानधनावर खर्च करण्यात येऊ नये.

५. वरील खर्च करण्यासाठी महसुल विभाग, सार्वजनिक आरोग्य विभाग व वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील नियंत्रण अधिकारी व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना कोषागारात देयक सादर करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर निधी अनावश्यकरित्या आहरित करून बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच खर्च करण्यात यावा.

६. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. तसेच राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

७. वरील प्रयोजनासाठी होणारा खर्च प्रधान लेखाशीर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०४) इतर बाबी, ३१ सहाय्यक अनुदाने (२२४५ ०२४४) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध करून देण्यात येत आहे. वरील प्रयोजनासाठी होणारा खर्च उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीच्या मर्यादेत भागविण्यात यावा.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ८१/व्यय-९/२०२०, दिनांक २२.७.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००७२४१६३८४७६९१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( सु.ह.उमराणीकर )
उपसचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
४. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य,
५. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
६. प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य विभाग ),जी.टी.हॉस्पीटल, मुंबई,
७. संचालक (आरोग्य सेवा), महाराष्ट्र राज्य,मुंबई,
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. सर्व जिल्हाधिकारी,
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
११. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१२. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१४. मा.मंत्री ( मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१५. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१६. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१७. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१८. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१९. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )